**मुंबई मेट्रो मार्ग -१२ (कल्याण-तळोजा) प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज वितरीत करणे व सदर कर्जाच्या मुद्दलाची प्राधिकरणाकडून वसूली करणे याकरिता नविन लेखाशिर्षे उघडण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमआरडी-३३२३/प्र.क्र.१५२/नवि-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०६ जून, २०२४.

**प्रस्तावना:-**

मुंबई मेट्रो मार्ग -१२ (कल्याण-तळोजा) या एकूण लांबी २०.७५६ कि.मी, स्थानके - १७ व अंदाजित रु. ५८६५ कोटी किंमतीच्या प्रकल्पाची मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत अंमलबजावणी करण्यात येत आहे. शासनाने सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीस नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.एमआरडी-३३१९/प्र.क्र.१९ (भाग-२)/नवि-७, दिनांक ०६ सप्टेंबर, २०१७ अन्वये मान्यता दिली आहे. सदर प्रकल्पाच्या मंजूर वित्तीय आराखड्यानुसार प्रकल्पावरील केंद्रीय कराच्या ५० टक्के व राज्य शासनाचे कर (१०० टक्के) तसेच जमिनीची किंमत याकरीता एकूण रु. २६८ कोटी इतके बिनव्याजी दुय्यम कर्ज राज्य शासनाकडून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला उपलब्ध करून द्यावयाचे आहे. सदरचे दुय्यम कर्ज निधी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला वितरीत करण्यासाठी तसेच सदर कर्जाच्या मुद्दलाची प्राधिकरणाकडून राज्य शासनाला परतफेड करण्यासाठी नवीन लेखाशीर्षे उघडण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मुंबई मेट्रो मार्ग - १२ (कल्याण-तळोजा) प्रकल्पासाठी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला राज्य शासनाचे बिनव्याजी दुय्यम कर्ज वितरीत करणे व सदर कर्जाच्या

मुद्दलाची प्राधिकरणाकडून वसूली करणे याकरिता नविन लेखाशिर्षे उघडण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजुरी प्रदान करण्यात येत आहे :-

| | |
|---|---|
| **अ) खर्चाचे लेखाशिर्षे - मुंबई मेट्रो रेल्वे १२ प्रकल्पाकरिता एमएमआरडीएला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज वितरणाकरिता** | |
| Demand F-7 | मागणी क्र. एफ-७ |
| 6217, Loans For Urban Development | ६२१७, नगर विकासासाठी कर्जे |
| 01 State Capital Development | ०१, राज्य भांडवली विकास |
| 190, Loans to Public Sector and other Undertakings | १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे |
| (00)(08) State Government Subordinate Loan to MMRDA for Mumbai Metro Rail Route 12 Project<br>(State) (Scheme)<br>55, Loans and Advances | (००)(०८) मुंबई मेट्रो रेल्वे मार्गिका १२ प्रकल्पाकरिता एमएमआरडीएला राज्य शासनाचे दुय्यम कर्ज<br>(राज्य) (कार्यक्रम)<br>५५- कर्जे व आगाऊ रकमा |
| CRC (62171042) | संकेतांक (६२१७१०४२) |
| **ब) जमेचे लेखाशीर्ष- मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला मुंबई मेट्रो रेल्वे मार्ग - १२ प्रकल्पासाठी राज्य शासनाकडून देण्यात आलेल्या दुय्यम कर्जाच्या मुद्दलाची वसुली करण्यासाठी** | |
| **Demand F-7** | **मागणी क्र. एफ-७** |
| 6217, Loans For Urban Development | ६२१७, नगर विकासासाठी कर्जे |
| 01 State Capital Development | ०१, राज्य भांडवली विकास |
| 190, Loans to Public Sector and other Undertakings | १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे |
| (00)(08) Recovery of principal of Sub-ordinate loan given by State Government to MMRDA for Mumbai Metro Rail Route 12 Project. | (००)(०८) मुंबई मेट्रो रेल्वे मार्गिका १२ प्रकल्पासाठी एमएमआरडीएला राज्य शासनाकडून दिलेल्या दुय्यम कर्जाच्या मुद्दलाची वसुली |
| CRC (6217515301) | संकेतांक (६२१७५१५३०१) |

**०२.** उपरोक्त नमूद नवीन लेखाशिर्षे २०२४-२५ या आर्थिक वर्षापासून अंमलात येतील.

**०३.** सदरचा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने तसेच महालेखाकार कार्यालयाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. सं.ख.वि./चा-१ नगर विकास विभाग/यूओआर-१७२/२०२३-२४/११७४, दिनांक ०७.०२.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६०६१६२३३७०७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=d242787d25852443527f4a3927a849feec29ce26368b8badbee9e69852845f0a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E1FEEA176A1E6A273C574BB6F1A1EDB58BF87424118BCCD6EE07340581733B70, cn=VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2024.06.06 16:37:06 +05'30'

**( विजय चौधरी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. महालेखाकार, महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, महाराष्ट्र-२, नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१०. कक्ष अधिकारी, व्यय-३/अर्थसंकल्प-१६/ऋण व हमी/अर्थोपाय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी, नवि-४/५/३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. लेखा अधिकारी (नवि-३१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती, नवि-७.